**बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्था/लोकसेवा केंद्रांना देण्यात येणाऱ्या विनानिविदा कामांच्या वित्तीय मर्यादेत सुधारणा करण्याबाबत**

# महाराष्ट्र शासन

**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : कौविउ-२०२१/प्र.क्र. १४०/प्रशा. २**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८ ऑगस्ट, २०२४

**वाचा:-** १) रोजगार व स्वयंरोजगार विभाग, शासन निर्णय क्र. रोस्वरो-२००२/प्र. क्र. २६७/रोस्वरो-१, दि. १७ ऑगस्ट, २००२ व दि. ३० सप्टेंबर, २०१०.

२) रोजगार व स्वयंरोजगार विभाग, शासन निर्णय क्र. इएसई-२००३/प्र. क्र. १९१/रोस्वरो-१, दि. ०१ फेब्रुवारी, २००६.

३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. मातंस/नस्ती २०१२/प्र. क्र. २७३/का. ३९, दि. १८ डिसेंबर, २०१४.

४) उदयोग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र. क्र.८२ /भाग-III/उद्योग-४, दि. ०१ डिसेंबर, २०१६.

५) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, शासन निर्णय क्र. कौविउवि-२०१५/प्र. क्र. ९७/रोस्वरो-१, दि. ११ डिसेंबर, २०१५.

६) उदयोग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. भांखस-२०२१/प्र. क्र.८ /उद्योग-४, दि. ०७ मे, २०२१.

**प्रस्तावना:-**

सन २००० मध्ये शासनाने बेरोजगारीचा प्रश्न सोडविण्यासाठी रोजगार व स्वयंरोजगाराचे नवीन धोरण अंमलात आणले. त्यानुसार बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्था स्थापन करण्यात आल्या आहेत. बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्था/लोकसेवा संस्थांना आर्थिकदृष्ट्या बळकट करण्याची आवश्यकता विचारात घेऊन संदर्भाधीन दि. १७.०८.२००२ च्या शासन निर्णयाद्वारे शासकीय/निमशासकीय कामे वाटून देण्याबाबत विविध विभागांना सूचना देण्यात आल्या आहेत. सदर संस्थांना मिळणाऱ्या कामाची वित्तीय मर्यादा अत्यंत कमी असल्याचे निदर्शनास आल्याने सदर संस्थांना शासकीय/निमशासकीय कार्यालयांकडून ₹५.०० लक्ष पर्यंतची कामे विनानिविदा द्यावीत तसेच, जिल्हास्तरीय कामे त्या-त्या जिल्ह्यातील सहकारी सेवा संस्थांना द्यावीत असा निर्णय संदर्भाधीन दि. ०१.०२.२००६ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. सदर कामे पारदर्शक पद्धतीने वाटप करण्याच्या दृष्टीने मुंबई शहर व मुंबई उपनगर या जिल्ह्यांमध्ये अतिरिक्त जिल्हाधिकारी व उर्वरित जिल्ह्यांमध्ये मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हा काम वाटप समित्या स्थापन करण्यात आल्या आहेत.

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दि. १८.१२.२०१४ च्या शासन निर्णयान्वये ₹३.०० लाखापेक्षा अधिक खर्चाच्या कामांना ई-निविदा कार्यप्रणाली लागू केली होती. सदर बाब विचारात घेऊन विभागाच्या दि. ११.१२.२०१५ च्या शासन निर्णयान्वये बेरोजगारांच्या सहकारी सेवा संस्थांना/लोकसेवा केंद्राना देण्यात येणाऱ्या विनानिविदा (दरपत्रकाच्या आधारे द्यावयाच्या) कामाची मर्यादा ₹ ५.०० लक्षवरून कमी करुन ₹३.०० लक्ष इतकी करण्यात आली आहे.

उदयोग, ऊर्जा व कामगार विभागाच्या संदर्भाधीन दि. ०१.१२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठी सुधारित कार्यपद्धती लागू करण्यात आली आहे. सदर सुधारित कार्यपद्धतीबाबतच्या नियमपुस्तिकेतील प्रकरण ३ परिच्छेद ३.२.३ मध्ये दरपत्रकाच्या आधारे खरेदी करण्याबाबतचा तपशील नमूद करण्यात आला असून दरपत्रकाच्या आधारे खरेदीची मर्यादा ₹ ३.०० इतकी विहीत करण्यात आली आहे. तद्नंतर उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि. ०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयान्वये दरपत्रकाच्या आधारे करण्यात येणाऱ्या खरेदीची मर्यादा ₹ ३.०० लाखावरुन ₹१०.०० लक्ष इतकी वाढविली आहे.

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संदर्भाधीन दि. २४.०४.२०१५ च्या शासन निर्णयान्वये सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत कामाच्या निविदा बोलाविणे तसेच मजूर सहकारी संस्था, सुशिक्षित बेरोजगार अभियंता यांना कामवाटपासंदर्भात मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या होत्या. त्यानुसार ₹३.०० लक्षपेक्षा खालील किंमतीच्या कामाचे वाटप सहकार विभागाने स्थापित केलेल्या जिल्हास्तरावरील काम वाटप समित्यांमार्फत करण्यात येत होते व ₹३.०० लक्षपेक्षा अधिक रकमेच्या कामांच्या वाटपाकरीता ई-निविदा कार्यप्रणाली अनिवार्य करण्यात आली होती. तद्नंतर सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संदर्भाधीन दि. २९.०७.२०२१ च्या शासन निर्णयान्वये ₹१०.०० लक्षपेक्षा खालील किंमतीच्या कामाचे वाटप सहकार विभागाने स्थापित केलेल्या जिल्हास्तरावरील काम वाटप समित्यांमार्फत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. तसेच ₹१०.०० लक्षपेक्षा अधिक रकमेच्या कामांच्या वाटपाकरीता ई-निविदा कार्यप्रणाली अनिवार्य करण्यात आली आहे. त्याच धर्तीवर बेरोजगार सेवा सहकारी संस्थाकडून सदर संस्थांना देण्यात येणाऱ्या विना निविदा कामाची वित्तीय मर्यादा ₹१०.०० लक्ष पर्यंत वाढविण्याची मागणी करण्यात येत होती. त्यानुषंगाने बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्थांना/लोकसेवा केंद्राना देण्यात येणाऱ्या विनानिविदा कामाच्या वित्तीय मर्यादेत सुधारणा करण्याची व त्याबाबतची कार्यपद्धती विहीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

संदर्भाधीन दि. ०१.०२.२००६ च्या शासन निर्णयात पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे:-

१) राज्यातील बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्थांना/लोकसेवा केंद्रांना स्वावलंबी होण्यासाठी अधिक रकमेची कामे देण्याचा निर्णय घेण्यात येत आहे. त्यानुसार जेव्हा कामाची रक्कम ₹१०.०० लक्ष पर्यंत असेल, तेव्हा कामाबाबत दरपत्रक मागवून (खुली स्पर्धात्मक निविदा न मागवता) करता येईल. तुलना करण्याकरिता अशी दरपत्रके खुल्या बाजारातून

कमीत कमी तीन वेगवेगळ्या सेवा पुरवठादारांकडून (बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्था/लोकसेवा केंद्र) मागविण्यात यावीत. दरपत्रक सादर करणाऱ्या पुरवठादारांचा संबंधित कार्यालयाबरोबर कोणतेही हितसंबंध नसावेत. यापूर्वी असे दिसून आले आहे की, संबंधित अधिकारी जास्त रकमेचे आदेश लहान-लहान आदेशामध्ये विभागणी करतात आणि ते त्याच पुरवठादाराकडून दरपत्रकाच्या आधारे खरेदी करतात. ही प्रथा काटेकोरपणे टाळण्यात यावी. एका आर्थिक वर्षात दरपत्रकाच्या माध्यमातून देण्यात आलेल्या एकाच प्रकारच्या कामाचे एकूण मूल्य ₹ १०.०० लक्ष पेक्षा जास्त नसावे.

२) संदर्भाधीन दि. ०१.०२.२००६ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ५ मधील "अटी व शर्ती" या शिर्षाखालील अ. क्र. ४ पुढीलप्रमाणे वाचण्यात यावा:-

"बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्थांना/लोकसेवा केंद्रांना ₹ १०.०० लक्ष पर्यंतची कामे विनानिविदा देण्यासाठी ₹ १०.०० लक्षपेक्षा जास्त कामाचे तुकडे करुन ती सदर संस्थांना देण्यात येवू नयेत. जे अधिकारी कामाचे तुकडे पाडतील किंवा जे त्याला मान्यता देतील, अशा सर्वांवर शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल."

२. बेरोजगार सेवा सहकारी संस्थांना/लोकसेवा केंद्रांना देण्यात येणाऱ्या विनानिविदा कामांबाबत यापूर्वीच्या शासन निर्णयांतील इतर सर्वसाधारण तरतूदी कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८२८१७१३२८१७०३ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRABHAKAR ATMARAM SANKHE

Digitally signed by PRABHAKAR ATMARAM SANKHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILLS EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT, 2.5.4.20=1bac9385344f87e77e1084162b6716914d02e353160fac64808fec76c25d6d90, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2F853CAC13002D53D7034663C6F0D48D3ADE65B7222B4D38B6E5902DB13A4750, cn=PRABHAKAR ATMARAM SANKHE
Date: 2024.08.28 17:28:12 +05'30'

**( प्रभाकर संखे )**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव
४) मा.उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव
५) मा. मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता यांचे खाजगी सचिव
६) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, विधान मंडळ सचिवालय, मुंबई.
७) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, विधान मंडळ सचिवालय, मुंबई.
८) सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य
९) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
१०) मा. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) मा. अपर मुख्य सचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२) सर्व मंत्रालयीन विभाग
१३) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
१४) सर्व जिल्हाधिकारी
१५) महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
१६) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८) सर्व उप आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय,
१९) सर्व सहायक आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र,
२०) निवडनस्ती- कार्यासन प्रशा-२